**मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत "११- देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दीष्टाखाली उपलब्ध असणारा निधी "०३- अतिकालिक भत्ता" या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८/फ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २७ मार्च, २०२५.

**वाचा** : १) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र.एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८/फ-२, दि.२९.०७.२०२४, दि.१०.१०.२०२४ व दि.२८.०२.२०२५.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.०१(भाग-१)/६३६/२०२४-२५, दि.१९.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ करीता मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजना अंतर्गत "०३- अतिकालिक भत्ता" या उप लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी अपुरा पडत असल्यामुळे उपरोक्त "वाचा" क्र.१ येथील शासन आदेशान्वये, मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२), प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६), अग्नीपासून वनांचे संरक्षण (२४०६ ०१३१), कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी (२४०६ ०१४९), मध्यवर्ती रोपमळे वन (२४०६ ०२५६), शासकिय अभिकरणाकडून समुपयोजन (तेंदू) (२४०६ ०४५२) व शासकिय अभिकरणाकडून समुपयोजन (इमारती लाकुड) (२४०६ ४७२) व निसर्ग संवर्धन व वन्यपशू संरक्षण (२४०६ ०७६६) या ८ लेखाशिर्षाखालील "११- देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेल्या निधीपैकी रु.७२.७६ लक्ष इतका निधी "०३- अतिकालिक भत्ता" या उद्दीष्टाखाली पुनर्वितरणाव्दारे उपलब्ध करून देण्यात आला होता.

तथापि, सदर निधीही अपुरा पडत असल्यामुळे अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या "वाचा" क्र.२ येथील पत्रान्वये, "११- देशांतर्गत प्रवास खर्च" या अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीपैकी एकूण **रु.३६.२१ लक्ष** इतका निधी "०३- अतिकालिक भत्ता" या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करून मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास पुन:श्च सादर केला आहे.

त्या अनुषंगाने, सदर निधी पुनर्वितरण करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

सन २०२४-२५ या वर्षाकरीता मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजनांतर्गत पुढील ६ लेखाशिर्षाखालील “११- देशांतर्गत प्रवास खर्च” या उद्दीष्टाखाली उपलब्ध असणाऱ्या निधीपैकी **रु.३६.२१ लक्ष** इतका निधी “०३- अतिकालिक भत्ता” या उद्दीष्टाखाली पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे पुनर्वितरण करण्यास, सुधारीत अंदाजाच्या व बीम्स् (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**(रक्कम लाखात)**

| अ. क्र. | मुख्यलेखाशिर्ष | सविस्तर शीर्ष | सुधारीत अंदाजानुसार अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी पुनर्वितरणा-मुळे उपलब्ध निधी | एकूण निधी (४+५) | वितरित निधी | खर्च झालेला निधी | शिल्लक निधी (७-८) | पुनर्वितरणा करिता प्रस्तावित निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १. | मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ३६.७५ | --- | ३६.७५ | ३६.७५ | २६.११ | १०.६४ | (- ३.८५) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | १.०५ | --- | १.०५ | १.०५ | १.०३ | ०.०२ | (+ ३.८५) |
| २. | प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ५२.५० | - ६.८० | ४५.७० | ४५.७० | १४.९३ | ३०.७७ | (- २.९७) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | ३.१५ | + ६.८० | ९.९५ | ९.९५ | ९.९२ | ०.०३ | (+ २.९७) |
| ३. | प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ७००.०० | - २०.४३ | ६७९.५७ | ६७९.५७ | ११३.६९ | ५६५.८८ | (- १८.२२) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | ९.०० | + २०.४३ | २९.४३ | २९.४३ | २९.०६ | ०.३७ | (+ १८.२२) |
| ४. | अग्नीपासून वनांचे संरक्षण (२४०६ ०१३१) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ९७.०० | - २६.२८ | ७०.७२ | ७०.७२ | २३.१७ | ४७.५५ | (- १०.००) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | ६.३० | + २६.२८ | ३२.५८ | ३२.५८ | ३१.७८ | ०.८० | (+ १०.००) |
| ५. | कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी (२४०६ ०१४९) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | २७.३० | - १.०६ | २६.२४ | २६.२४ | १३.२३ | १३.०१ | (- ०.८२) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | २.१० | + १.०६ | ३.१६ | ३.१६ | २.९२ | ०.२४ | (+ ०.८२) |
| ६. | संचालक, सामाजिक वनीकरण आणि मुख्य वनसंरक्षक (२४०६ ८५०६) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | २.८० | --- | २.८० | २.८० | ०.८३ | १.९७ | (- ०.३५) |
| | | ०३- अतिकालिक भत्ता | ०.५० | --- | ०.५० | ०.४९९५ | ०.४९९५ | ०.००८५ | (+ ०.३५) |
| | **एकूण** | **११- देशांतर्गत प्रवास खर्च** | | | | | | | **(- ३६.२१)** |
| | | **०३- अतिकालिक भत्ता** | | | | | | | **(+ ३६.२१)** |

२. पुनर्वितरणाने उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे. त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची खातरजमा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १५६/व्यय-१०, दि.२१.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१७३१५०५८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAMESH
NAMDEO JAGTAP

Digitally signed by RAMESH NAMDEO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0c19f5aff07e8e032316c50df2eee86d4eadc6e4ac1e502c4ce53a7762e7e059, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B42F1BB542CD2BC481C3C6F994B28EBD58BB368E14A9C6CBD23808C8315A965C, cn=RAMESH NAMDEO JAGTAP
Date: 2025.03.27 17:32:37 +05'30'

**( रमेश जगताप )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व) आणि अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
४) मुख्य वनसंरक्षक (सर्व).
५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
९) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
११) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.